अभिजात मराठी भाषा पाठपुरावा समितीच्या कामकाज व अनुषंगिक बाबींकरिता निधी उपलब्ध करुन देणेबाबत

**महाराष्ट्र शासन**
**मराठी भाषा विभाग**
**शासन निर्णय क्रमांकः अभिजा २०२४/प्र.क्र.४६/भाषा-१**
नवीन प्रशासन भवन, ८ वा मजला,
हुतात्मा राजगुरु चौक, मादाम कामा मार्ग,
मंत्रालय, मुंबई-४०० ०३२.
दिनांक : २८ मे, २०२४.

**वाचा:-**

(१) मराठी भाषा विभाग, शासन निर्णय क्रमांक अभिजा २०२३/प्र.क्र.११६/भाषा-१, दि.१४.०२.२०२४
(२) मराठी भाषा विभाग, शासन पूरक पत्र क्रमांक मभाभ २०२३/प्र.क्र.११६/भाषा-१, दि.१४.०३.२०२४.
(३) सदस्य सचिव, अभिजात मराठी भाषा पाठपुरावा समिती यांचे पत्र क्र.जा.क्र.विनिमं-२०२४/अमभा/५०३,दि.१५.०५.२०२४

**प्रस्तावना**

एखाद्या भाषेला अभिजात भाषेचा दर्जा देण्याची कार्यवाही केंद्र शासनाकडून केली जाते. याकरिता केंद्र शासनाने काही निकष निश्चित केले आहेत. श्री.रंगनाथ पठारे यांच्या अध्यक्षतेखालील समितीने या निकषाच्या आधारे संशोधन आणि अभ्यास करुन मराठी भाषेला अभिजात भाषेचा दर्जा मिळण्यासंदर्भात तयार केलेला मराठी भाषेमधील मूळ अहवाल दि.१२.०७.२०१३ च्या शासन पत्रान्वये केंद्र शासनाकडे पाठविला आहे. त्यानंतर समितीने परिशिष्टांसह सादर केलेला इंग्रजी भाषेमधील अहवाल देखील केंद्र शासनाकडे दि.१६.११.२०१३ रोजी पाठविला आहे. तद्‌नंतर मराठी भाषेस अभिजात भाषेचा दर्जा देण्यासंदर्भात सचिव / प्रधान सचिव, मा.मुख्य सचिव, मा. मंत्री, मा.मुख्यमंत्री यांचे स्तरावर सातत्याने केंद्र शासनाकडे पाठपुरावा करण्यात आला आहे

संदर्भाधीन क्र.१ येथील दि.१४.०२.२०२४ रोजीच्या शासन निर्णयान्वये व संदर्भाधीन क्र.२ येथील दि.१४.०३.२०२४ रोजीच्या शासन पूरक पत्रान्वये मराठी भाषेला अभिजात भाषेचा दर्जा मिळण्याच्या अनुषंगाने केंद्र शासनाकडे पाठपुरावा करण्याकरिता श्री. ज्ञानेश्वर मुळे, सेवानिवृत्त (भा.वि.से.) यांच्या अध्यक्षतेखाली खालीलप्रमाणे अभिजात मराठी भाषा पाठपुरावा समिती गठित करण्यात आली आहे,

| अ.क्र. | नाव | पदनाम |
|---|---|---|
| ०१. | श्री.ज्ञानेश्वर मुळे, सेवानिवृत्त (भा. वि.से) | अध्यक्ष |
| ०२. | अध्यक्ष, महाराष्ट्र राज्य साहित्य आणि संस्कृती मंडळ, मुंबई, अध्यक्ष, | सदस्य |
| ०३. | अध्यक्ष, महाराष्ट्र राज्य मराठी विश्वकोश निर्मिती मंडळ, मुंबई, | सदस्य |
| ०४. | अध्यक्ष, भाषा सल्लागार समिती | सदस्य |
| ०५. | श्री. संजय नहार, अध्यक्ष, सरहद संस्था, पुणे | सदस्य |
| ०६. | सचिव, महाराष्ट्र राज्य मराठी विश्वकोश निर्मिती मंडळ, मुंबई | सदस्य सचिव |

सदस्य सचिव, अभिजात मराठी भाषा पाठपुरावा समिती तथा सचिव, महाराष्ट्र राज्य मराठी विश्वकोश निर्मिती मंडळ, मुंबई यांनी संदर्भाधीन क्र.३ येथील दि.१५.०५.२०२४ रोजीच्या पत्रान्वये सादर केलेल्या प्रस्तावास अनुसरुन सदर समितीच्या बैठकांचे आयोजन करणे व अनुषंगिक बाबींकरिता येणाऱ्या खर्चाकरिता रु.१.०० लक्ष इतका निधी वितरीत करण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

**शासन निर्णय :-**

अभिजात मराठी भाषा पाठपुरावा समितीच्या बैठकांचे आयोजन व अनुषंगिक खर्चाकरिता रु.१.०० लक्ष (अक्षरी एक लक्ष फक्त) इतका निधी महाराष्ट्र राज्य मराठी विश्वकोश निर्मिती मंडळ, मुंबई यांना वितरीत करण्यात येत आहे.

सदर खर्च मागणी क्र.झेडएफ-१, २०५२-सचिवालय सर्वसाधारण सेवा, (००) (०४) मराठी भाषेचा प्रचार व प्रसारासाठी हाती घ्यावयाचे उपक्रम (कार्यक्रम) (२०५२ ५२३२) या लेखाशीर्षाअंतर्गत ५०- इतर खर्च या तपशीलवार शीर्षाखाली सन २०२४-२५ या आर्थिक वर्षामध्ये मंजूर तरतूदीतून भागविण्यात यावा.

सन २०२४-२५ या आर्थिक वर्षामध्ये लेखाशीर्ष मराठी भाषेचा प्रचार व प्रसारासाठी हाती घ्यावयाचे उपक्रम (कार्यक्रम) (२०५२ ५२३२) अंतर्गत ५०- इतर खर्च खाली अर्थसंकल्पित असलेला निधी आहरित व संवितरीत करण्यासाठी सहायक लेखा अधिकारी, महाराष्ट्र राज्य मराठी विश्वकोश निर्मिती मंडळ, मुंबई यांना आहरण व संवितरण अधिकारी व सचिव, महाराष्ट्र राज्य मराठी विश्वकोश निर्मिती मंडळ, मुंबई यांना नियंत्रक अधिकारी म्हणून घोषित करण्यात येत आहे.

सदर निधीचा विनियोग झाल्यानंतर त्याबाबतचा अहवाल व उपयोगिता प्रमाणपत्र शासनास वेळोवेळी सादर करावे.

सदर शासन निर्णय वित्त विभागाच्या शासन निर्णय क्रमांक : विअप्र-२०१३/प्र.क्र.३०/२०२३/विनिमय, भाग-२, दि.१७.०४.२०१५ अन्वये वित्तीय अधिकार नियम पुस्तिका- १९७८ (भाग पहिला), उप विभाग-तीन, अनुक्रमांक-४, परिच्छेद क्रमांक २७(२) नुसार प्रशासनिक विभागाला प्रदान करण्यात आलेल्या वित्तीय अधिकारानुसार निर्गमित करण्यात येत आहे.

सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेतांक २०२४०५२८११५२२१३८३३ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

NITIN JOTIRAM DANGARE

Digitally signed by NITIN JOTIRAM DANGARE
DN: c=IN, o=GOVERNMENT OF MAHARASHTRA, ou=MARATHI LANGUAGE DEPARTMENT, 2.5.4.20=2199314143adc352dccd62da8d57c0c437f1857f98da7b40525225bbbd5b59e9, postalCode=400032, st=Maharashtra, serialNumber=EF4BF635C99B4893102C08CC8CC543C45250E19DC2A7932C127A2E60D75F7904, cn=NITIN JOTIRAM DANGARE
Date: 2024.05.28 16:06:12 +05'30'

**( नितिन जो. डंगारे )**
**अवर सचिव, महाराष्ट्र शासन**

**प्रत-**

१. मा. राज्यपाल यांचे सचिव, राज्यपाल भवन, मुंबई
२. मा. मुख्यमंत्री यांचे अपर मुख्य सचिव, मंत्रालय, मुंबई.
३. मा. मंत्री (मराठी भाषा) यांचे खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई.
४. मा. विरोधी पक्ष नेता विधानपरिषद/ विधानसभा, विधान भवन, मुंबई.
५. मा. मुख्य सचिव, महाराष्ट्र शासन.
६. महाराष्ट्र- १ (लेखापरीक्षा / लेखा व अनुज्ञेयता), मुंबई, नागपूर.
७. महालेखापाल, महाराष्ट्र-२ (लेखापरीक्षा / लेखा व अनुज्ञेयता), मुंबई, नागपूर.

८. प्रबंधक, उच्च न्यायालय, मूळ शाखा, मुंबई.
९. प्रबंधक, उच्च न्यायालय, अपिल शाखा, मुंबई.
१०. प्रबंधक, लोक आयुक्त आणि उप लोक आयुक्त कार्यालय, मुंबई.
११. अपर मुख्य सचिव, वित्त विभाग, मंत्रालय मुंबई.
१२. अपर मुख्य सचिव, मराठी भाषा विभाग, यांचे स्वीय सहायक, मंत्रालय, मुंबई.
१३. सह सचिव, मराठी भाषा विभाग, यांचे स्वीय सहायक, मंत्रालय, मुंबई.
१४. अधिदान व लेखा अधिकारी, मुंबई,
१५. निवासी लेखा परीक्षा अधिकारी, मुंबई,
१६. सर्व अवर सचिव/ कक्ष अधिकारी, मराठी भाषा विभाग, मंत्रालय, मुंबई,
१७. सदस्य सचिव, अभिजात मराठी भाषा पाठपुरावा समिती तथा सचिव, महाराष्ट्र राज्य मराठी विश्वकोश निर्मिती मंडळ, मुंबई.
१८. निवड नस्ती (भाषा-१)